**पुरक पोषण आहार योजना हया केंद्र पुरस्कृत योजनेसाठी सन २०१९ च्या हिवाळी अधिवेशनात मंजूर पुरवणी मागणी च्या ८०% (केंद्र व राज्य हिस्सा मिळून) म्हणजेच रु.१६०.०० कोटी इतका निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१९/प्र.क्र.१६९/का-५**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २७ जानेवारी, २०२०.

<u>वाचा</u> :- (१) वित्त विभाग, परिपत्रक क्र.पूरक २०१९/प्रक्र.११५/अर्थ-३, दिनांक ३ जानेवारी,२०२०.

**<u>प्रस्तावना</u> :-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत पुरक पोषण आहार योजना (केंद्र हिस्सा ५०% लेखाशीर्ष २२३६-१९२७ व समरुप राज्य हिस्सा ५०% लेखाशिर्ष २२३६१९३६) ही केंद्रपुरस्कृत योजना आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई या कार्यालयाकडून राबविण्यात येत आहे.

२. केंद्र शासनाने राज्यात राबवावयाच्या पूरक पोषण आहार योजनेसाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता केंद्र हिस्सा ५०% (लेखाशिर्ष २२३६१९२७) रु.६०५.६०७२ कोटी व समरुप राज्य हिस्सा ५०% (लेखाशिर्ष २२३६१९३६) रु.६०५.६०७२ कोटी याप्रमाणे एकंदर रु.१२११.२१४४ कोटी इतका APIP मंजूर झाला आहे.

तसेच, या योजनेकरीता राज्याच्या सन २०१९-२०च्या अर्थसंकल्पात एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) याअंतर्गत **मागणी क्रमांक एक्स-१,(०८)(०३) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) केद्र हिस्सा ५०% (कार्यक्रम) १९, आहार खर्च,लेखाशिर्ष संकेतांक २२३६१९२७ याखाली रु.५४८.७६ कोटी व मागणी क्रमांक एक्स-१,(०८)(०४) एकात्मिक बाल विकास सेवा योजना(आहार खर्च) (राज्य हिस्सा ५०% ) (कार्यक्रम) १९, आहार खर्च लेखाशिर्ष संकेतांक २२३६-१९२७ याखाली रु.५४८.७६ कोटी याप्रमाणे एकूण रु.१०९७.५२ कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. तसेच सन २०१९ च्या पावसाळी अधिवेशनात रु.२००.०० कोटी व हिवाळी अधिवेशनात रु.२००.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.**

३. या योजनेकरीता सन २०१९ च्या हिवाळी अधिवेशनात मंजूर रु.२००.०० कोटी पुरवणी मागणीच्या ८०% (केंद्र व राज्य हिस्सा मिळून) म्हणजेच रु.१६०.०० कोटी (अक्षरी रुपये एकशे साठ कोटी फक्त ) इतका निधी वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना योजनेवरील खर्चाकरीता वितरीत व खर्च करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमीत करण्यात येत आहे.

<u>शासन निर्णय</u> :-

एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) या योजनेकरीता **केंद्र हिस्सा ५०% (लेखाशिर्ष २२३६१९२७) रु.१००.०० कोटी व समरुप राज्य हिस्सा ५०% (लेखाशिर्ष २२३६१९३६) रु.१००.०० कोटी याप्रमाणे एकंदर रु.२००.०० कोटी इतकी तरतूद** सन २०१९ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीव्दारे मंजूर **करण्यात आली आहे. सद्य:स्थितीत मंजूर पुरवणी मागणीच्या ८०% म्हणजेच रु.१६०.०० कोटी** (अक्षरी रुपये एकशे साठ कोटी फक्त ) **इतका निधी (केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा मिळून) योजनेवरील खर्चाकरीता वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यानुसार या योजनेवरील सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील खर्चाकरीता केंद्र हिस्सा (५०%) याखाली रु.८०.०० कोटी व राज्य हिस्सा (५०%) याखाली रु.८०.०० कोटी याप्रमाणे एकूण रु.१६०.०० कोटी इतका**

**निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना वितरीत व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.**

२. या योजनेंतर्गत सन २०१९ च्या हिवाळी अधिवेशनात मंजूर पुरवणी मागणीच्या निधीपैकी रु.१६०.०० कोटी (अक्षरी रुपये **एकशे साठ** कोटी फक्त ) तरतूद ही गरम ताजा आहार व THR यासाठी समप्रमाणात वितरीत करण्याची दक्षता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी घ्यावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५/२०२० /व्यय-६, दिनांक २४.०१.२०२० अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१२७१६०६२४१५३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2020.01.27 16:07:20 +05'30'

**( ला. रा. गुजर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे उप मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री/राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधानपरिषद), विधानभवन,मुंबई.
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्य, मंत्रालय, मुंबई-३२
६) सचिव (महिला व बालविकास विभाग), मंत्रालय, मुंबई.
७) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई.
९) सर्व जिल्हाधिकारी.
१०) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
११) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास.
१२) सर्व महिला व बाल विकास अधिकारी, (जिल्हा परिषद).
१३) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी) प्रकल्प.
१४) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४७२)/ वित्त विभाग (व्यय-६) मंत्रालय, मुंबई.
१९) अवर सचिव (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना कळविण्यात येते की, त्यांनी एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत पुरक पोषण आहार योजना (१९-आहार खर्च) या प्रयोजनार्थ सन २०१९ च्या हिवाळी अधिवेशनात मंजूर पुरवणी मागणी रु.२००.०० कोटीच्या निधीपैकी केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २२३६१९२७) रु.८०.०० कोटी व समरुप राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २२३६१९३६) रु.८०.०० याप्रमाणे एकूण रु.१६०.०० कोटी (अक्षरी रुपये एकशे साठ कोटी फक्त ) इतका निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना BDS प्रणालीवर वितरीत करावा.
२०) निवड नस्ती कार्या-५, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

----------------